**महाराष्ट्रात विशेष आर्थिक क्षेत्रांची उभारणी/ विकास करण्यासंदर्भांत राज्याचे धोरण मुद्रांक शुल्क व नोंदणी फी माफीच्या सवलतीस मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सेझ-२०१७/प्र.क्र.१६०/उद्योग-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २५ फेब्रुवारी ,२०२२

वाचा:-

१) शासन निर्णय क्र. एसईझेड-२००१/(१५२)/उद्योग-२, दिनांक १२/१०/२००१
२) शासन शुध्दीपत्रक क्र.एसईझेड- २००१/(१५२)/उद्योग-२, दिनांक २४ /१०/२००५.
३) शासन निर्णय क्र. एसईझेड- २००५/(१०२८)/उद्योग-२, दिनांक ०२/०३/२००७
४) महसूल व वन विभागाची अधिसूचना क्र. मुद्रांक २००७/६५७/प्र.क्र. ८७/म-१, दिनांक २३/०३/२००७
५) महसूल व वन विभागाचा अधिसूचना क्र. मुद्रांक २००७/६५७/प्र.क्र. ८७/म-१, दिनांक ०८/०६/२००७
६) शासन निर्णय क्र. एसईझेड-२०१७/(१६०)/उद्योग-२, दिनांक २२/१७/२०१७
७) महसूल व वन विभागाची अधिसूचना क्र .नोंदणी-२०१७/अनौ.३०/प्र.क्र.५३७/म-१, दि.१६/०२/२०१८

प्रस्तावना :-

राज्यात विशेष आर्थिक क्षेत्र विकसित करण्यासाठी स्थापित करणाऱ्या विकासक, सह विकासक व उद्योग घटकांना जमिनीच्या प्रथम खरेदीवर/भाडेपट्टयावर मुद्रांक शुल्क व नोंदणी फी माफीची सवलत दिनांक ०२/०३/२००७ च्या शासन निर्णयाव्दारे तसेच महसुल विभागाच्या दिनांक २३/०३/२००७ च्या अधिसुचनेव्दारे अनुज्ञेय करण्यात आली आहे. ही सवलत केंद्र शासनाने विशेष आर्थिक क्षेत्र अधिनियम कलम-३ च्या पोटकलम (१०) अन्वये विशेष आर्थिक क्षेत्र विकसित करण्यास दिलेल्या मंजुरीच्या दिनांकापासून १० वर्षेपर्यंत अनुज्ञेय करण्यात आली होती. याबाबत मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक ०७/११/२०१७ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मुद्राक शुल्क व नोंदणी माफीची सवलतीचा कालावधी १० वर्षावरुन २५ वर्षापर्यंत वाढविण्याचा तसेच वाढीव १५ वर्षाचा कालावधी हा प्रत्येकी ५ वर्षाच्या ३ टप्प्यात अनुज्ञेय करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर निर्णयानुसार पहिल्या टप्प्यात मुद्रांक शुल्क आणि नोंदणी माफीच्या सवलतीचा कालावधी १० वर्षावरून १५ वर्षापर्यंत वाढविण्याबाबतचा शासन निर्णय दिनांक २२/११/२०१७ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. प्रथम टप्प्यातील सवलतीचा कालावधी दिनांक २२/०३/२०२२ रोजी संपुष्टात येणार असल्याने दुसऱ्या टप्प्यात मुद्रांक शुल्क आणि नोंदणी माफीची सवलत १५ वर्षावरून २० वर्षापर्यंत अनुज्ञेय करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

दिनांक २२ नोव्हेंबर, २०१७ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्यात विकसित करण्यात येत असलेल्या विशेष आर्थिक क्षेत्राचे विकासक किंवा सहविकासक आणि जमिन मालक आणि त्यातील घटक यांच्या दरम्यानच्या जमिनीच्या प्रथम व्यवहारावर/भाडेपट्टयावर महाराष्ट्र मुद्रांक शुल्क अधिनियम,१९५८ व नोंदणी फी १९०८ अन्वये अनुक्रमे मुद्रांक शुल्क आणि नोंदणी फी माफीची सवलत केंद्र शासनाच्या विशेष आर्थिक क्षेत्र अधिनियमातील कलम ३ च्या पोटकलम १० अन्वये विशेष आर्थिक क्षेत्र विकसीत करण्यास दिलेल्या मंजुरीच्या दिनांकापासून १५ वर्षाकरीता अनुज्ञेय करण्यात आली होती.

आता ही सवलत केंद्र शासनाच्या विशेष आर्थिक क्षेत्र अधिनियमातील कलम ३ च्या पोट कलम १० अन्वये विशेष आर्थिक क्षेत्र विकसीत करण्यास दिलेल्या मंजुरीच्या दिनांकापासून २० वर्षाकरीता अनुज्ञेय राहील.

२. राज्यातील काही विशेष आर्थिक क्षेत्रांचा यापूर्वी केंद्र शासनाकडून मंजूरी दिलेल्या १५ वर्षाचा कालावधी संपुष्टात आला आहे. अशा विशेष आर्थिक क्षेत्राकडून सदरहू शासन निर्णय निर्गमित करण्याच्या दिनांकापासून मुद्रांक शुल्क व नोंदणी फी संदर्भात काही व्यवहार झाले असल्यास आणि मुद्रांक शुल्क व नोंदणी फी ची रक्कम राज्य शासनास अदा केली असल्यास त्या रकमांचा परतावा त्यांना दिला जाणार नाही.

३. हा शासन निर्णय मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक ०७/११/२०१७ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०२२५११४२५०६०१० असा आहे.सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRY, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2022.03.02 15:23:05 +05'30'

**( संजय देगांवकर )**
**सह सचिव (उद्योग), महाराष्ट्र शासन**

**प्रति :**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.
४. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.
५. अध्यक्ष विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
६. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
७. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री (सर्व) व मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
१०. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. अ.मु.स. (उद्योग) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. प्रधान सचिव, (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई-३२.
१५. प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६. प्रधान सचिव (नवि-२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१७. प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई-३२.

१८. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी (पू), मुंबई-३२.
१९. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालयासमोर, मुंबई ३२.
२०. विभागीय आयुक्त ( सर्व महसुली विभाग)
२१. आयुक्त, महानगर पालिका (सर्व).
२२. सर्व जिल्हाधिकारी.
२३. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२४. उप महानिरिक्षक, मुंद्रांक शुल्क, मुंबई.
२५. निमंत्रक, उद्योग मित्र, मुंबई.
२६. उद्योग विभागातील सर्व सहसचिव / उप सचिव/ कक्ष अधिकारी.
२७. कक्ष अधिकारी (म-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
२८. निवडनस्ती (कार्यासन उद्योग-२).